**राज्य उत्पादन शुल्क विभागातील निरीक्षक (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांना उप अधीक्षक (गट-ब) या संवर्गात देण्यात येणाऱ्या पदोन्नतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- इएसटी-२७१७/ प्र.क्र.१०१/ राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ ऑक्टोबर, २०१८.

**शासन आदेश -**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील निरीक्षक (गट-ब) या संवर्गातून उप अधीक्षक (गट-ब) या संवर्गात पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१७-१८ च्या पदोन्नतीसूचीमधील खालील अधिकाऱ्यांना उप अधीक्षक (गट-ब) या संवर्गात खुल्या प्रवर्गातून पदोन्नती देण्यात येत असून, सदर पदोन्नतीनंतर, त्यांची त्यांच्या नावासमोर (स्तंभ ४ येथे) दर्शविण्यात आलेल्या महसूली विभागामध्ये (स्तंभ ५ येथे) दर्शविण्यात आलेल्या रिक्त ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | मूळ प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूली संवर्ग | पदोन्नतीनंतर देण्यात येणारी पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | श्री. टी. आर. देशमुख | खुला | कोकण-२ | उप अधीक्षक, मुंबई उपनगर-१ |
| २ | श्री. सी. पी. निकम | खुला | नाशिक | उप अधीक्षक, अहमदनगर |
| ३ | श्री. एम. जी. सांबरे | खुला | नाशिक | उप अधीक्षक, मे. कोपरगाव स.सा.का., अहमदनगर |
| ४ | श्री. बी. आर. चौगुले | खुला | पुणे | उप अधीक्षक, कोल्हापूर |
| ५ | श्री. एस. आर. जाधव | खुला | पुणे | उप अधीक्षक, राउशु, हडपसर, पुणे |
| ६ | श्री. बी. एन. भूतकर | इ.मा.व. | नाशिक | उप अधीक्षक, नाशिक |
| ७ | श्री. पी. व्ही. गोतमारे | इ.मा.व. | औरंगाबाद | उप अधीक्षक, मे. महाराष्ट्र डिस्टिलरी, (युनायटेड स्पिरीट लि.) औरंगाबाद |
| ८ | श्री. एम. एच. शेख | खुला | कोकण-१ | उप अधीक्षक, वसई-पालघर |
| ९ | श्री. एस. एम. तवसाळकर | इ.मा.व. | औरंगाबाद | उप अधीक्षक, मे. फॉस्टर्स इंडिया, औरंगाबाद |

२. सदर पदोन्नती ही, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात, सेवाज्येष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गातील पदांवर मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यामुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा अन्य कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. संबंधित निरीक्षक यांनी उप अधीक्षक पदाची पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का-१२,दिनांक १२.९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१७-१८ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येतील व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत उप अधिक्षक पदावरील पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल .

४. सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचा स्वीकार करून, पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. संबंधित अधिकाऱ्यांना उपरोक्त पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत आयुक्त, राउशु यांनी शासनास त्वरीत कळवावे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१८१०१७१२०१०५८९२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.10.17 12:09:44 +05'30'

**( पु.हि.वागदे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
३) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नागपूर.
४) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६) संबंधित अधीक्षक,राज्य उत्पादन शुल्क.
७) संबंधित अधिकारी
८) कक्ष अधिकरी, राउशु-२/राउशु-३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती-(राउशु-१)